**पुणे जिल्ह्यातील मुळशी व वेल्हे तालुक्यातून जाणारा रस्ता (इजिमा-७४) प्रजिमा म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१६/प्र.क्र.७९/नियोजन-२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक- १२ एप्रिल, २०१७**

**पहावे** :- १) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ पुणे-१ यांचे पत्र क्र.जा. क्र./रेशा/९०५३/२०१६, दिनांक १९ नोव्हेंबर, २०१६.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र क्र.जा क्र.मुअ(पुणे)/का-२/रेशा/२४७/६८२७/२०१६, दिनांक २४ नोव्हेंबर, २०१६.
३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र क्र.जा. क्र.मुअ(पुणे)/का-२/रेशा/२४७/७८०/२०१६, दिनांक १६ फेब्रुवारी, २०१७.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,पुणे यांनी संदर्भाधीन पत्रान्वये पुणे जिल्ह्यातील मुळशी व वेल्हे तालुक्यातून जाणारा रस्ता प्रजिमा-२७ पानशेत ते वरसगांव- साईव बु.- मोसे बु.- पाथरशेत - बेंबटमाळ- आडमाळ- पडळघर- दासवे- भोईनी - मुगांव रस्ता) इ.जि.मा.-७४) हा ३७.०० कि.मी. लांबीचा (साखळी क्र. ०/०० ते ३७/००) रस्ता दर्जोन्नत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर रस्त्यावर पानशेत व वरसगांव या दोन धरणांकडे जाणारा निसर्ग संपन्न परिसर असल्याने पर्यटकांची बाराही महिने मोठ्या प्रमाणात वर्दळ चालु असते. तसेच या रस्त्यांवरून शेतमालाची वाहतूक, दूध वाहतूक, नागरिक व विद्यार्थी वाहतूक होते. त्यामुळे हा रस्ता आर्थिकदृष्ट्या महत्त्वाचा असल्याने हा मार्ग प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचा उपरोक्त प्रस्ताव व जिल्हा परिषद, पुणे यांचा ठराव विचारात घेऊन प्रजिमा-२७ पानशेत ते वरसगांव- साईव बु.- मोसे बु.- पाथरशेत- बेंबटमाळ-आडमाळ- पडळघर- दासवे- भोईनी- मुगांव रस्ता (इ.जि.मा.-७४) हा रस्ता प्रजिमा- १६४ म्हणून दर्जोन्नत करण्यात येत आहे.

उपरोक्त इजिमा रस्त्याची एकूण **३७.०० कि.मी.** लांबी प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत केल्यामुळे रस्ते विकास योजना २००१-२१ मधील प्रमुख जिल्हा मार्गाच्या पुणे जिल्ह्याच्या लांबीत ३७.०० कि. मी. ने वाढ होवून एकूण लांबी (४१५९.७४ + ३७.०० ) म्हणजे **४१९६.७४ कि. मी.** इतकी होईल व इतर जिल्हा मार्गाच्या जिल्ह्याच्या लांबीत ४२.०० कि. मी. ने घट होऊन एकूण लांबी (२३७४.२४ - ४२.०० ) म्हणजे **२३३८.२४ कि. मी.** इतकी होईल

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१२१२१९३५९३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2017.04.12 12:37:35 +05'30'

**( प्रशांत पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) जिल्हाधिकारी, पुणे.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.
५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, पुणे-१ (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सुचनानुसार या रस्त्यांची माहिती अद्ययावत करावी व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे (दक्षिण).
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
९) निवडनस्ती.